महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय या कार्यालयासाठी जागा भाड्याने घेण्यास मंजूरी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र. १८०/ नवि-३३**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १४ फेब्रुवारी, २०१७**

संदर्भ :- कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय यांच्या कार्यालयाची टिप्पणी दिनांक ०७ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना:-**

केद्रशासन पुरस्कृत अमृत/ स्मार्ट सिटी/ स्वच्छ भारत या कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी राज्य स्तरावरील महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय (अमृत/ स्वच्छ महाराष्ट्र/ स्मार्ट सिटी) या कार्यालयासाठी जागा भाडयाने घेण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

केद्रशासन पुरस्कृत अमृत/ स्मार्ट सिटी/ स्वच्छ भारत या कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी राज्य स्तरावरील महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय (अमृत/ स्वच्छ महाराष्ट्र/ स्मार्ट सिटी) या कार्यालयासाठी खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार जागा भाडयाने घेण्यास व त्याकरिता इमारत भाडे प्रदान करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| इमारत/ जागा मालकाचे नाव | जागेचा पत्ता | जागेचे क्षेत्रफळ (चौ. फूट) | प्रमाणित केलेला जागा भाडयाचा दर (रूपये प्रति चौ.फू.) | प्रमाणित केलेले व दरमहा प्रदान करावयाचे भाडे (रूपये) | जागा भाडयाचा कालावधी |
|---|---|---|---|---|---|
| मे. सायबर विंडोज इंडिया प्रा. लिमिटेड, ४०७ कस्तुरी इमारत जेआरडी टाटा रोड, चर्चगेट, मुंबई | ३१ए,३२ए, ३५-ए, ए विंग, मित्तल टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई | २५६८ चौ. फू. | रूपये ३०५ प्रति चौ. फूट. | रूपये ७,८३,२४०/- (सेवा कर, मालमत्ता कर, सोसायटी चार्जेस, विमा व इतर कोणत्याही चार्जेस व करांसहित) | जागा ताब्यात घेतल्यापासून ३ वर्षे |

२. सदर कार्यालयासाठी इच्छित ठिकाणी शासकीय जागा उपलब्ध नसल्याचे संबंधित कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच, सामान्य प्रशासन विभागाने प्रमाणित केले आहे. तसेच, उपरोक्त परिच्छेद १ मधील तक्त्यात दर्शविलेला जागा भाड्याचा दर वाजवी असल्याचे प्रमाणपत्र कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, इलाखा शहर यांनी उपलब्ध करुन दिले आहे.

३. सदर कार्यालयीन जागा अद्यावत फर्निचरसह, सोसायटी कार पार्किंग व कॉर्पोरेशन चार्जेस सह प्रस्तावित जागा भाड्यामध्ये उपलब्ध होणार आहे.

४. सदर जागेचे भाडे जागा मालकास अदा करताना आयकर कायद्यानुसार स्त्रोताच्या ठिकाणी कर कपातीचे (Tax deduction at source) नियमानुसार आवश्यक कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

५. याबाबत होणारा खर्च, "मागणी क्रमांक एफ-२, मुख्यलेखाशीर्ष २२१७, नगर विकास, ०१, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) (०१) (०१) स्वच्छ महाराष्ट्र अभियानांतर्गत राज्य अभियान संचालनालय, १४ भाडेपट्टी व कर (२२१७ ९८४१) योजनेतर" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग एक ते पाच, शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार व नगर विकास विभाग कार्यासन नवि-३४ व नवि-२३ यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२१४१४५२५६०९२५ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षरित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.02.14 16:41:16 +05'30'

**(पां. जो. जाधव)**
सह सचिव
नगर विकास विभाग

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव

३. मा. विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, (नवि-२) यांचे स्वीय सहायक
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी
८. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय
९. उप सचिव, नगर विकास विभाग (नवि-३४)
१०.उप सचिव, नगर विकास विभाग (नवि-२३)
११.अवर सचिव नगर विकास विभाग (नवि-३४/ नवि-२३/ नवि-०४)
१२.कक्ष अधिकारी नगर विकास विभाग (नवि-३३/ नवि-०४)
१३. विभागीय आयुक्त (सर्व)
१४. जिल्हाधिकारी (सर्व)
१५.आयुक्त (सर्व महानगरपालिका)
१६.मुख्याधिकारी (सर्व नगरपरिषदा/नगरपंचायती)
१७. निवडनस्ती (नवि-३३)